साखर कारखान्यांची गाळप क्षमता वाढ/ विस्तारीकरण करणेसाठी अभ्यास गट स्थापन करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक :- ससाका-०३२५/प्र.क्र.६७ /२५-स,**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक :- २५ /०३/२०२५.

वाचा:-

१. साखर आयुक्त, पुणे यांचे पत्र क्र.साआ/विकास/गाळप क्षमतावाढ धोरण/२८६/२०२३, दि.१४/०७/२०२३.
२. साखर आयुक्त, पुणे यांचे पत्र क्र.साआ/विकास/ गा.क्ष.वा./८३/२०२५, दि.१४/०२/२०२५

**प्रस्तावना** :

साखर कारखान्याच्या गाळप क्षमता वाढीच्या प्रस्तावासंदर्भात अभ्यास करण्यासाठी व गाळप क्षमतावाढ करण्याविषयीचे धोरणात्मक निर्णय घेण्यासाठी साखर आयुक्त, पुणे यांच्या अध्यक्षतेखालील समितीने दि.१४/०७/२०२३ रोजीच्या पत्राने शासनास अहवाल सादर केला होता. आता ठिबक सिंचन योजना, जलयुक्त शिवार योजना तसेच (A.I.) टेक्नॉलॉजीमुळे कृषी क्षेत्रात झालेल्या प्रगतीमुळे ऊस उपलब्धतेत वाढ झाली आहे किंवा कसे याबाबत अभ्यास करून अहवाल सादर करण्यासाठी साखर आयुक्त, पुणे यांच्या अध्यक्षतेखाली अभ्यास गट स्थापन करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:**

राज्यातील साखर कारखान्यांच्या गाळप क्षमतेत वाढ करण्याच्या अनुषंगाने ठिबक सिंचन योजना, जलयुक्त शिवार योजनांमुळे तसेच कृत्रिम बुद्धीमत्ता (A.I.) तंत्रज्ञानामुळे कृषि क्षेत्रात झालेल्या प्रगतीमुळे ऊस उपलब्धतेत वाढ झाली आहे किंवा कसे याबाबत अभ्यास करण्यासाठी साखर आयुक्त, पुणे यांच्या अध्यक्षतेखाली खालीलप्रमाणे अभ्यास गट स्थापन करण्यात येत आहे.

| अ.क्र. | नाव व पदनाम | पद |
|---|---|---|
| १ | साखर आयुक्त, पुणे | अध्यक्ष |
| २ | कृषि आयुक्त, पुणे | सह अध्यक्ष |
| ३ | संचालक, प्रशासन | सदस्य |
| ४ | संचालक, अर्थ | सदस्य |
| ५ | सहसंचालक, अर्थ | सदस्य |
| ६ | सहसंचालक, विकास | सदस्य सचिव |

वरील अभ्यास गटाने ठिबक सिंचन योजना, जलयुक्त शिवार योजनांमुळे तसेच कृत्रिम बुद्धीमत्ता (A.I.) तंत्रज्ञानामुळे कृषि क्षेत्रात झालेल्या प्रगतीमुळे सद्य:स्थितीत राज्यातील ऊसाच्या उपलब्धतेत वाढ झाली आहे किंवा कसे याबाबत परिक्षण करुन उपरोक्त साखर कारखान्यांच्या गाळप क्षमता वाढीसाठी

ऊस उपलब्धता असल्याबाबत तसेच गाळपाच्या हंगामाचा कालावधी प्रमाणित करुन साखर आयुक्त स्तरावरुन कारखान्यांना औद्योगिक परवाना (IEM) ना हरकत प्रमाणपत्र देणेबाबत केंद्र शासनास शिफारस करण्यात यावी.

प्रस्तूत शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आलेला असून त्याचा संकेतांक २०२५०३२५१९३१४८८८०२ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने.

ANKUSH PANDURANG SHINGADE

Digitally signed by ANKUSH PANDURANG SHINGADE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=COOPERATION MARKETING AND TEXTILE DEPARTMENT, 2.5.4.20=0619305c0a0825664efa457ffa51c3f2364841c81f8c43707 8a333b7111446a2, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=E11F71FCAC231B0F91F430636DE14F6C49B569D17 3346155B9208DCD97DD078B, cn=ANKUSH PANDURANG SHINGADE
Date: 2025.03.25 19:32:56 +05'30'

**( अंकुश पां. शिंगाडे )**
**उप सचिव , महाराष्ट्र शासन**

**प्रत माहितीसाठी :-**

१) मा. मुख्यमंत्री, यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
२) मा. उप मुख्यमंत्री (वित्त व नियोजन) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा. उप मुख्यमंत्री (नगरविकास ) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई
४) मा. मंत्री (सहकार) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
५) मा. राज्यमंत्री (सहकार) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
६) प्रधान सचिव (कृषि) मंत्रालय, मुंबई.
७) साखर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, पुणे
८) कृषि आयुक्त, महाराष्ट्र राज्य पुणे.
९) निवडनस्ती २५-स